**गोरठा येथील अप्पर पेनगंगा कॅनॉलच्या बोगदयास**
**कै.आ.बाबासाहेब देशमुख गोरठेकरांचे नाव देणेबाबत**

महाराष्ट्र शासन
जलसंपदा विभाग
शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण २००९/५२ आयबी/(४४४/२००९)मोप्र-२
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक - ०१.०२.२०१०

**प्रस्तावना** : मा.कै.आ.बाबासाहेब गोरठेकर हे भोकर विधानसभा मतदार संघातील गोरठा या गावचे रहिवाशी होते. त्यांना लहानपणापासूनच सामाजिक व राजकीय जीवनात काम करण्याचा ओढा होता. त्यांनी गोरठा गावचे सरपंच ते पंचायत समितीचे सभापती पद, उमरी सहकारी जिनींग प्रेसींगची स्थापना करणे, नांदेड जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकचे उपाध्यक्ष पद व त्यानंतर जिल्हा परिषद नांदेड चे अध्यक्ष पद व १९८० ते १९८५ आणि १९९९ ते २००३ पर्यंत भोकर विधानसभा मतदार संघाचे आमदार म्हणून भोकर विधानसभा मतदार संघात केलेल्या नानाविध कार्याचा गौरव म्हणून गोरठा येथील अप्पर पेनगंगा कॅनॉलच्या बोगदयास त्यांचे नाव देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :**

मा.कै.आ.बाबासाहेब गोरठेकर यांनी त्यांच्या सार्वजनिक जीवनाच्या काळात भोकर विधानसभा मतदार संघात केलेल्या कामाचा गौरव म्हणून अप्पर पैनगंगा कॅनॉलच्या गोरठा येथील बोगदयास **''कै.आ.बाबासाहेब देशमुख गोरठेकर भुयारी जलवाहिनी'' ,** असे नाव देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक क्र. २०१००२०११९०३५८००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(मु.कि.वैरागडे)
शासनाचे उप सचिव

प्रति,

खाजगी सचिव, मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
खाजगी सचिव, मा.मंत्री (जलसंपदा) मंत्रालय, मुंबई
खाजगी सचिव, मा.राज्यमंत्री (जलसंपदा) मंत्रालय, मुंबई
स्वीय सहायक, मा.सचिव(जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद
स्वीय सहायक, मु.अ.(द व प्र) व स.स., जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
मुख्य अभियंता व मुख्य प्रशासक, लाभक्षेत्र विकास, जलसंपदा विभाग, औरंगाबाद
अधीक्षक अभियंता, उर्ध्व पैनगंगा प्रकल्प मंडळ, नांदेड
कार्यकारी अभियंता, उर्ध्व पैनगंगा प्रकल्प विभाग क्रमांक ६, नांदेड
मोप्र-२ कार्यासन संग्रहार्थ